अग्निशमन आपत्कालिन सेवांचे बळकटीकरण करण्यासाठी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान योजनेंतर्गत सटाणा (जि.नाशिक) नगरपरिषद यांना निधी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-अशसे-२०२०/प्र.क्र.२३/नवि-०४**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- ११ मार्च,२०२०**

**वाचा:-** १) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.अशस-४०७/३६०/प्र.क्र.२११/नवि-२०, दि.३१.०८.२००९.
२) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.अशस-२०११/२७४/प्र.क्र.३८/नवि-२०, दि.३० मार्च,२०११.
३) महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.मअसे/३२- क/ २०१९/१७८, दि.६ फेब्रुवारी,२०२०.

**प्रस्तावना :-**

राज्यातील ड-वर्ग महानगरपालिका/नगरपरिषदा तसेच नगरपंचायती यांच्या अग्निशमन सेवेतील तूट भरून काढण्याकरिता व राज्यातील अग्निशमन सेवेचे सक्षमीकरण करण्याकरिता विविध आवश्यक उपाययोजना करण्याच्या दृष्टीने दि.३१.०८.२००९ रोजी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अग्निसुरक्षा अभियान राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सदर शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या सूत्राप्रमाणे ("ड"वर्ग महानगरपालिकांसाठी ३५ % शासन हिस्सा, "अ" वर्ग नगरपरिषदांसाठी ५०% शासन हिस्सा, "ब" वर्ग नगरपरिषदांसाठी ७०% शासन हिस्सा, तसेच "क" वर्ग नगरपरिषदांसाठी ८०% शासन हिस्सा ) अनुदान देण्यासाठी संबंधित नगरपरिषदांकडून प्राप्त सविस्तर प्रकल्प अहवालांच्या छाननीअंती अनुदान वितरित करण्यात येते. वाचा क्र.१ अन्वये कोपरगाव नगरपरिषदेला १ अग्निशमन केंद्र व १ अग्निशमन वाहन खरेदीसाठी रु.८० लाख इतका निधी अनुज्ञेय असुन यात शासनाचा हिस्सा रु.६४ लाख (८०%) व नगरपरिषदेचा हिस्सा रु.१६ लाख (२०%) इतका आहे. वाचा क्र.२ अन्वये शासनाच्या हिस्स्यापैकी रु.३२ लाख इतके अनुदान कोपरगाव नगरपरिषदेला वितरीत करण्यात आलेले आहेत. शासन हिस्स्याचे उर्वरीत रू.३२ लाख इतके अनुदान संबधीत नगरपरिषदेला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांनी वाचा क्र.३ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत **सटाणा (जि.नाशिक) नगरपरिषदेला** शासन हिस्स्याच्या अनुज्ञेय अनुदानाच्या दुसऱ्या टप्प्याचे **रु. ३२ लाख (अक्षरी रक्कम रुपये बत्तीस लाख फक्त)** इतके अनुदान वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अनुदान वाचा क्र.१ व २ येथील शासन निर्णयातील अटी व शर्तीच्या अधीन राहुन वितरीत करण्यात येत आहे.

३. या खर्चाचे देयक काढण्यासाठी संचालक, महाराष्ट्र अग्निमशन सेवा संचालनालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात आले असून, त्यांनी सदर रक्कमेचा धनादेश मुख्याधिकारी, सटाणा नगरपरिषद,जि.नाशिक यांच्या नावे काढावा.

४. सदर कामासाठी येणारा खर्च "एफ-२, २२१७, नगर विकास, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००)(५३) राज्यातील नगरपरिषदांना अग्निशमन सेवा व आणीबाणीच्या सेवांच्या बळकटीकरणासाठी सहाय (२२१७ ३२१५) ३१, सहाय्यक अनुदान (वेनतेतर)" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करून देण्यात आलेल्या सन २०१९-२० च्या मंजूर अनुदानमधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार विनियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जूलै,२०१९ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ मधील तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२००३०९१६४२४५४१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sharad Kirwale

Digitally signed by Sharad Kirwale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7ed23302d612eecfa1f6e35cc7ef096ce9dc6a6c617b767e8f74743b779e2b96, cn=Sharad Kirwale
Date: 2020.03.09 17:55:22 +05'30'

**( शरद किरवले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

५) प्रधान सचिव-१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
८) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/ नागपूर
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
११) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई
१२) अग्निशमन सल्लागार, महाराष्ट्र शासन, सांताक्रुझ (पुर्व), मुंबई
१३) संचालक, अग्निशमन सेवा संचालनालय, सांताक्रुझ (पुर्व), मुंबई.

यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी मुख्याधिकारी,सटाणा नगरपरिषद,जि.नाशिक यांना वितरित करुन अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

१४) मुख्याधिकारी, सटाणा नगरपरिषद,जि.नाशिक.
१५) कक्ष अधिकारी (व्यय-३) / (अथसंकल्प-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) कक्ष अधिकारी (नवि-२९)/(नवि-३१), नगर विकास, विभाग,मंत्रालय, मुंबई
१७) निवडनस्ती, (नवि-०४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.